**कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील श्री. विनय कुळकर्णी यांच्या “सहायक आयुक्त” पदावरील नेमणुकीस महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम-४५(४) नुसार मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- कडोंम १०२२/ प्र. क्र. २७/नवि-२८**

मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ एप्रिल, २०२२

**संदर्भ:-** १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.कडोंम-१०१९/प्र.क्र.१३९/नवि-२८, दि.०१.०६.२०२१.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.कडोंम-१०२०/प्र.क्र.०३/नवि-२८, दि.०१.०६.२०२१.
३) कल्याण-डोंबिवली महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र. ५७, दि.१३.०८.२००९.
४) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे पत्र क्र. कडोंमपा/साप्रमु/ प्र. क्र. ३६१(१), दि.०३.०६.२०१३.
५) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचे पत्र क्र.कडोंमपा/साप्र/टे क्र.९/ २७७६, दि.०७.०३.२०२२.

**प्रस्तावना-**

आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांनी महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील श्री.विनय कुळकर्णी, लेखापाल, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांना “सहायक आयुक्त” या पदावर महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम-४५(४) अन्वये पदोन्नतीने नियुक्तीस शासन मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन दि.०७.०३.२०२२ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

२. श्री. विनय कुळकर्णी यांना “सहायक आयुक्त” संवर्गात पदोन्नती देण्यासंदर्भात विभागीय पदोन्नती समितीने पात्रता तपासून केलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने तत्कालीन सेवा प्रवेश नियमात समाविष्ट नसलेल्या परंतू आस्थापना सूचीनुसार मंजूर असलेल्या पदांपैकी रिक्त पदांवर महानगरपालिका आस्थापना खर्चाच्या मर्यादेच्या अधिन राहून पदोन्नती देण्याबाबत पदोन्नती समितीने शिफारस केली. त्यास कल्याण-डोंबिवली महानगरपालिका सर्वसाधारण सभेने ठराव क्र.५७, दि.१३.०८.२००९ अन्वये मंजुरी दिली आहे. त्याअनुषंगाने श्री. विनय कुळकर्णी यांच्या “सहायक आयुक्त” या पदावरील नेमणुकीस शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांचेकडून संदर्भीय दि.०७.०३.२०२२ च्या पत्रान्वये प्राप्त प्रस्ताव व कल्याण-डोंबिवली महानगरपालिका सर्वसाधारण सभा ठराव क्र.५७, दि.१३.०८.२००९ अन्वये पदोन्नतीस दिलेली मान्यता विचारात घेता, श्री. विनय कुळकर्णी यांच्या “सहायक आयुक्त” कल्याण-डोंबिवली महानगरपालिका या पदावरील नेमणुकीस महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम-४५(४) अन्वये शासन मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०४२९१२०१२३७७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Navnath Ravaji Wath

Digitally signed by Navnath Ravaji Wath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=885bfbac1d8ef74e3ffe622f226b31d75c2a13f319632f0da72fd54e57ac00ff, serialNumber=30e05bf6f1ed11d82b5689c9fc6b47a271a6b22790a9388dba7f3db15e247ff5, cn=Navnath Ravaji Wath
Date: 2022.05.13 11:57:37 +05'30'

**( नवनाथ रा. वाठ )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री (नगर विकास) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका, जि. ठाणे.
५) अपर मुख्य सचिव (नवि-२) महोदयांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) उप सचिव (नवि-२८), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवडनस्ती नवि-२८.